सन २०२१-२२ मध्ये राजर्षि छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना या योजनेकरिता निधी वितरीत करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन ज्ञापन क्रमांक: तंनिवि-१५२१/(प्र.क्र.७०/२१)/तांशि-३**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२,**
**दिनांक: १३ ऑक्टोबर, २०२१.**

**वाचा: -**

१) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम,दि.१७ एप्रिल, २०१५
२) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.टीईएम-२०१५/प्र.क्र.५०१/तांशि-४, दि.१३ ऑक्टोबर, २०१६.
३) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.टीईएम-२०१६/प्र.क्र.५५९/तांशि-४, दि.१५ एप्रिल, २०१७.
४) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, शासन निर्णय क्र.टीईएम-२०१६/प्र.क्र.५५९/तांशि-४, दि.२१ जून, २०१७
५) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३३२/तांशि-४, दि.७ ऑक्टोबर, २०१७.
६) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.६ एप्रिल, २०२१.
७) संचालक, तंत्रशिक्षण यांचे क्र.१८/अर्थसं/ईबीसी/खप्रमा/२०२०-२१/१५१, दि.१९ एप्रिल, २०२१.
८) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४ जून, २०२१.
९) शासन ज्ञापन, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, तंनिवि-१५२१/(प्र.क्र.७०/२१)/तांशि-३, दि.४ ऑगस्ट, २०२१
१०) संचालक, तंत्रशिक्षण यांचे क्र.१८/तंशिसं /डीबीटी/२०२१/२७३, दि.२५ ऑगस्ट, २०२१.

**प्रस्तावना:-**

आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकांतील विद्यार्थी केवळ निधी अभावी व्यावसायिक अभ्यासक्रमांपासून वंचित राहू नयेत म्हणून एक सामाजिक बांधिलकी व घटनात्मक उत्तरदायित्व म्हणून राज्य शासनाने सदर विद्यार्थ्यांची शुल्क प्रतिपूर्ती करण्याबाबतचा धोरणात्मक निर्णय शैक्षणिक वर्ष २००६-०७ मध्ये घेतलेला आहे. संदर्भ क्र.२ येथील दि.१३ ऑक्टोबर, २०१६ च्या शासन निर्णयानुसार काही बदलांसह योजना सुधारित स्वरुपात सन २०१६-१७ पासून लागू करण्यात आलेली आहे. तसेच संदर्भ क्र.३ येथील दि.१५ एप्रिल, २०१७ च्या शासन निर्णयानुसार या योजनेस "राजर्षि छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना" या नावाने संबोधण्यात येत आहे. तसेच संदर्भ क्र.५ येथील दि.७ ऑक्टोबर, २०१७ अन्वये राजर्षि छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजनेंतर्गत आर्थिकदृष्ट्या दुर्बल घटकातील पात्र विद्यार्थ्यांसाठी लाभाची व्याप्ती वाढविणे व नवीन अभ्यासक्रमांचा समावेश करण्याबाबत आदेश निर्गमित करण्यात आले आहेत.

"राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना" या योजनेसाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये मूळ अर्थसंकल्पात रु.६२२.०० कोटी इतकी तरतूद मंजूर करण्यात आलेली आहे. सदर योजनेंतर्गत शैक्षणिक वर्ष २०२०-२१ मध्ये पात्र ठरलेल्या विद्यार्थ्यांना शिष्यवृत्तीची प्रलंबित रक्कम अदा करण्यासाठी सदर योजनेसाठी मंजूर असलेल्या ६२२.०० कोटी इतक्या निधीपैकी रु.३११.०० कोटी इतका निधी संदर्भाधीन दि.४ ऑगस्ट, २०२१ च्या शासन ज्ञापनान्वये वितरीत करण्यात आलेला आहे. त्यानंतर संचालक, तंत्रशिक्षण यांनी दि.२५ ऑगस्ट, २०२१ च्या पत्रान्वये रु.६२२.०० कोटीपैकी उर्वरित रु.३११.०० कोटी इतका निधी वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. त्यास अनुसरुन सदर योजनेकरीता मंजूर तरतूदीपैकी उर्वरित रु.३११.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन ज्ञापन**:

"राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना" या योजनेंतर्गत तंत्रशिक्षण संचालनालयाच्या अधिपत्त्याखालील व्यावसायिक अभ्यासक्रमांकरीता शैक्षणिक वर्ष २०२०-२१ मध्ये प्रवेश घेतलेल्या व पात्र ठरलेल्या लाभार्थी विद्यार्थ्यांना प्रलंबित शिष्यवृत्तीची रक्कम अदा करण्याकरीता चालू वर्षी मंजूर झालेल्या रु.६२२.०० कोटी इतक्या निधीपैकी वितरीत केलेला रु.३११.०० कोटी इतका निधी वजा जाता उर्वरित रु.३११,००,००,०००/- (अक्षरी रुपये तीनशे अकरा कोटी फक्त) इतका निधी संचालक, तंत्रशिक्षण, मुंबई यांना "खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून" आंहरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे. तसेच आंहरित व वितरीत करावयाच्या निधीचा तपशील खालीलप्रमाणे आहे .

(रुपये कोटीत)

| सन २०२१-२२ करीता मंजूर निधी | चालू वर्षी वितरीत केलेला निधी | अवितरीत निधी | वितरीत करावयाचा निधी |
|---|---|---|---|
| ६२२.०० | ३११.०० | ३११.०० | ३११.०० |

**अटी :-**

१) शासन निर्णय, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, क्र.टीईएम-२०१५/प्र.क्र.५०१/तांशि-४, दि.१३ ऑक्टोबर, २०१६, क्र.टीईएम-२०१६/प्र.क्र.५५९/तांशि-४, दि.१५ एप्रिल, २०१७ व क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३३२/तांशि-४, दि.७ ऑक्टोबर, २०१७ तसेच या संदर्भातील इतर आदेशामध्ये नमूद अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

२) केंद्रीभूत प्रवेश प्रक्रियेतील पात्र प्रवेशित विद्यार्थ्यांनाच शैक्षणिक शुल्क शिष्यवृत्तीचा लाभ देण्यात यावा. ही रक्कम पात्र विद्यार्थ्यांच्या महाडिबीटी पोर्टलच्या माध्यमातून बँक खात्यात थेट जमा होईल या दृष्टिने कार्यवाही करावी. तथापि, न्यायालयीन निर्णयानुसार योग्य ती कार्यवाही करता येईल.

३) संचालक, तंत्रशिक्षण व सर्व विभागीय तंत्रशिक्षण सहसंचालकांनी त्यांच्या कार्यक्षेत्रातील नमुन्यादाखल काही संस्थाना भेट देऊन या योजनेची अंमलबजावणी व्यवस्थितरीत्या होत असल्याची वेळोवेळी तपासणी करावी व त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

४) यापूर्वीच्या तपासणी अहवालात काही त्रुटी/अनियमितता आढळून आली असल्यास ती तात्काळ दूर करण्यासाठी आवश्यक ती उपाययोजना संचालक, तंत्रशिक्षण यांनी करावी. चूकीची अथवा खोटी माहिती भरुन शासनाकडून शिक्षण शुल्क प्राप्त करुन घेतले असल्याचे निदर्शनास आले

असल्यास अशी रक्कम वसूल करुन ती शासनाकडे जमा करण्यात यावी. तसेच यामध्ये संस्था दोषी आढळल्यास सदर संस्थेच्या अभ्यासक्रमाची मान्यता काढून घेण्यासाठी अखिल भारतीय तंत्रशिक्षण परिषदेकडे अथवा अन्य सक्षम प्राधिकरणाकडे शिफारस करणे/फसवणूकीचा गुन्हा दाखल करणे या व अशा स्वरुपाची कडक कार्यवाही करण्यात यावी.

५) या शासन ज्ञापनाच्या दिनांकापासून १५ दिवसाच्या आत निधीचे वाटप करावे व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे. निधीचे वाटप करण्यास विलंब करु नये. याबाबतची जबाबदारी संचालक, तंत्रशिक्षण व विभागीय सहसंचालक, तंत्रशिक्षण यांची संयुक्तपणे राहील.

३. सदर योजनेसाठी होणारा खर्च "मागणी क्र.डब्ल्यू-३, मुख्य लेखाशिर्ष २२०३-तंत्रशिक्षण, तंत्रशिक्षण- १०७, शिष्यवृत्ती (००), (००)(०६) राजर्षी छत्रपती शाहू महाराज शिक्षण शुल्क शिष्यवृत्ती योजना, (कार्यक्रम) (२२०३ ०७४८), ३४, शिष्यवृत्ती/विद्यावेतने" या लेखाशिर्षाखाली दर्शविण्यात यावा व चालू आर्थिक वर्षात मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. संदर्भाधीन दि.२१ जून, २०१७ च्या शासन निर्णयातील परिच्छेद क्र.१० नुसार सदर योजनेचा प्रशासकीय खर्च भागविण्याकरीता तंत्रशिक्षण संचालनालयास प्रतिवर्षी विद्यार्थ्यांना अदा करण्यात येणाऱ्या एकूण खर्चाच्या ०.५ टक्के इतका निधी अनुज्ञेय राहील.

५. सदर योजनेंतर्गत शैक्षणिक वर्ष २०१९-२० व २०२०-२१ मध्ये पात्र ठरलेल्या ज्या विद्यार्थ्यांची शिष्यवृत्तीची रक्कम प्रलंबित आहे, अश्या विद्यार्थ्यांची शिष्यवृत्तीची प्रलंबित रक्कम या आदेशान्वये वितरीत केलेल्या निधीतून भागविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

६. हे शासन ज्ञापन नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२८८/१४७१, दि.९ सप्टेंबर, २०२१ अन्वये व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८४७/२०२१/व्यय-५, दि.१६ सप्टेंबर, २०२१ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असुन, त्याचा सांकेतांक २०२११०१२११२६४८९००८ असा आहे. हे शासन ज्ञापन डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MANALI MILIND SAMANT

Digitally signed by MANALI MILIND SAMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e4e402a7e3426729716afaf506c8f4a9d1528c744234b2ca1302837eaee0ebdd, pseudonym=34C820519ED3F7F8CB68C7CFB30E405DBAB491DD, serialNumber=C63B0A0419F0EB37099DACA08E4CCCCE3BF49154BF43E8881E68AC2CA3A46392, cn=MANALI MILIND SAMANT
Date: 2021.10.14 15:50:27 +05'30'

**(मनाली सामंत)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) सर्व विभागीय तंत्रशिक्षण सह संचालक. (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
३) महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
४) महालेखापाल, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र -१/२, मुंबई/नागपूर.
५) निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, बृहन्मुंबई.
७) नियोजन विभाग/वित्त विभाग, व्यय-५/अर्थसंकल्प-८, मंत्रालय, मुंबई.
८) कक्ष अधिकारी/तांशि-४, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
९) अवर सचिव/साशि-१, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती/तांशि-३.